**भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या आस्थापनेवरील अनुसूचित जमातीचे जातीदावे अवैध ठरलेल्या अधिकारी/कर्मचारी यांचेसाठी निर्माण केलेल्या अधिसंख्य पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

शासन निर्णय क्रमांकः आपना-०२२०/प्र.क्र. ३८/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,

क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई-४०० ००१

तारीखः १९ एप्रिल, २०२४

**वाचा-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: बीसीसी-२०१८/प्र.क्र. ३०८/ १६- ब दि.२१.१२.२०१९

२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक: आपना-०२२०/प्र.क्र. ३८/ पापु-१५, दि. २८.१२.२०२०

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग विभाग, क्रमांक: बीसीसी-२०१८/प्र.क्र. ३०८/ १६- ब दि.२७.११.२०२०

४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग विभाग, क्रमांक: बीसीसी-२०१८/प्र.क्र. ३०८/ १६- ब दि.२८.१०.२०२१

५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग विभाग, क्रमांक: बीसीसी-२०१८/प्र.क्र. ३०८/ १६- ब दि.१४.१०.२०२२

६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग विभाग, क्रमांक: बीसीसी-२०१८/प्र.क्र. ३०८/ १६- ब दि.१४.१२.२०२२

७) आयुक्त , भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्रमांक: अशासन/आस्था-३/ प्र.क्र.२६१/अधिसंख्य पदे/मुदतवाढ/७११-अ/२०२२ दि.२७.०३.२०२४

**प्रस्तावना:-**

मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपील क्र. ८९२८/२०१५ व इतर याचिकामध्ये दिनांक ६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने अनुसूचित जमातीचे प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या कर्मचा-यांना अधिसंख्य पदावर वर्ग करण्याबाबतची कार्यवाही संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आली आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि. २१.१२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि, अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर करू न शकलेल्या अथवा अन्य मागास प्रवर्गाचे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या अधिकारी/कर्मचा-यांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करुन त्यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्याच्या सूचना दिलेल्या आहेत त्यानुसार भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या अधिपत्याखालील संचालनालयाकडून प्राप्त माहितीनुसार ०६ कर्मचा-यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्यासाठी ०६ अधिसंख्य पदे दिनांक २८/१२/२०२० रोजीच्या संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आली आहेत. सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन क. ३, ४ व ५ येथील अनुक्रमे दिनांक २७/११/२०२०, २८/१०/२०२१ ,१४/१०/२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्यये अधिसंख्य पदावरील नियुक्त्यांना मुदतवाढ देण्याचा निर्णय घेतला आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णय दि. १४.१२.२०२२ अन्वये देण्यात आलेल्या सुचनांनुसार संदर्भ क्र.५ अन्वये देण्यात आलेली दि. २१/०९.२०२२ ते दि. २०/०८/२०२३ पर्यंतची मुदतवाढ संपुष्टात आल्याने त्यापुढील ११ महिन्याची मुदतवाढ देण्यासंबंधी आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपील क्र. ८९२८/२०१५ व इतर याचिकामध्ये दि. ६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची राज्यात अंमलबजावणी करण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक २१/१२/२०१९ मधील तरतुदीनुसार या विभागाच्या अधिनस्त भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांच्या आस्थापनेवरील खालील अधिसंख्य पदावर देण्यात आलेल्या नियुक्त्यांना त्यांच्या अधिनस्त पदावरील ११ महिन्यांचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर पुढील ११ महिने (दिनांक २२/०८/२०२३ ते दिनांक २१/०७/२०२४ ) किंवा ते सेवेत राहिले असते तर, ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते, त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यासगटाच्या शिफारशी प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तो पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | पदनाम | नियुक्तीचा दिनांक | सेवानिवृत्ती/ स्वे.से.नि. दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. मुकुंद नथ्थुजी भांडे | मदतनीस (गट-ड) | ०७.०९.१९८७ | ३१.०७.२०२४ |
| २ | श्री. सोन्याबापु आकाराम कोळी | शिपाई (गट-ड) | १४.०८.१९९२ | ३१.१२.२०२७ |

०२. अधिसंख्य पदावर नियुक्ती देण्यात आलेल्या ६ कर्मचा-यांपैकी खालील ४ कर्मचाऱ्यांना नियत वयोमानानुसार शासकीय सेवेतुन सेवानिवृत्त/स्वे.से.नि./मयत झाले असल्याने त्यांना यापुढे मुदतवाढ देण्याची आवश्यकता नाही.

| अ.क्र. | नाव | पदनाम | नियुक्तीचा दिनांक | सेवानिवृत्ती/ स्वे.से.नि. दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.मधुकर आनंदराव पिटले | सर्वेक्षक(गट- क) | १२.०३.१९९९ | दि.२३.०२.२०२३ रोजी मयत |
| २ | श्री. मोहनसिंग लक्ष्मणसिंग परदेशी | वाहन चालक (गट-क) | ३०.०१.२००१ | २८.०२.२०२३ |
| ३ | श्री. विकास तुकाराम बंदरी | वरिष्ठ लिपिक (गट-क) | १९.०९.१९८५ | ३१.१२.२०२० |
| ४ | श्री. विजयकुमार गोपाळराव निमजे | लघुटंकलेखक (गट -क) | ०८.०८.१९८५ | १४.०१.२०२० |

०३. सदर अधिसंख्य पदांच्या मुदतवाढीबाबतची कार्यवाही सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय दि. १४.१२.२०२२ रोजीच्या सुचनांनुसार संचालनालय स्तरावरुन करावी.

०४. सदर अधिसंख्य पदांच्या वेतनावर येणारा खर्च हा संबंधित कार्यालयाच्या वेतनासंबंधिच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०४१९१५२५६७१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANESH NIVRUTTI PAWAR

Digitally signed by GANESH NIVRUTTI PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1325A2533F628572438B5FB711C805DE49788678B97015BB0CAC990E3B375423, cn=GANESH NIVRUTTI PAWAR
Date: 2024.04.19 15:57:10 +05'30'

**(गणेश पवार)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१.आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, शिवाजीनगर, पुणे

२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता-१, महाराष्ट्र, मुंबई.

३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता-२. महाराष्ट्र, नागपूर.

४. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)

५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

६. मा. मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

७. प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय, मुंबई

८. कार्यासन (१६-२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

९. कार्यासन (वित्तीय सुधारणा, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

१०. निवडनस्ती आस्था-२